**सन २०१८-१९ मध्ये ई-गव्हर्नन्स प्रकल्प प्रकलपाकरिता रु. ३० लाख निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण -०५१८/प्र.क्र.१६०/१४-अे,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय मुंबई-४०० ०३२
दिनांक - २०/०२/२०१९

<u>संदर्भ</u> :-१) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र ६९/अर्थ-३, दिनांक ०२/४/२०१८
२) संचालक, आत्मा, कृषि आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्र.संप्र/लेखाशिर्ष ३४५१२७८२/ अनु.मा.प्र./२०१८-१९/६५/२०१८, दिनांक २३ एप्रिल, २०१८
३) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्रमांक संकीर्ण -०५१८/प्र.क्र.१६०/१४-अे, दि.२८/०५/२०१८
४) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र ६९/अर्थ-३, दिनांक २५/०१/२०१९.

**प्रस्तावना :-**

कृषि व पदुम विभागाचे (खुद्द), मंत्रालय तसेच कृषि आयुक्तालय व अखत्यारितील कार्यालयांचे संगणकीयदृष्ट्या बळकटीकरण व्हावे यासाठी राज्य ई-गव्हर्नन्स कार्यक्रम ही योजना राबविण्यात येते. कृषि पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय व मत्स्यव्यवसाय विभाग (खुद्द) व कृषि आयुक्तालयामार्फत ई-गव्हर्नन्स कार्यक्रमांतर्गत विविध उपक्रम राबविण्यात येतात. तसेच विविध उपक्रमांचे नियोजन करण्यात येते. सदर योजनेअंतर्गत राज्य शासनातर्फे दरवर्षी ठराविक रक्कम मंजूर करण्यात येते व सदर मंजूर झालेली रक्कम कृषि विभाग (खुद्द) तसेच कृषि आयुक्तालय, पुणे यांना विभागून वितरीत करण्यात येते.

ई-गव्हर्नन्स कार्यक्रम ही योजना योजनांतर्गत योजना असून सन २०१८-१९ या वित्तीय वर्षामध्ये सदर योजनेला “मागणी क्र.डी-७-३४५१, सचिवालय- आर्थिक सेवा, पंचवार्षिक योजनांतर्गत (०२) योजना (०२) (०४) ई-गव्हर्नन्स कार्यक्रम अंमलबजावणीकरिता योजना (कृषि) (३४५१ २७८२)” अंतर्गत १७ संगणक खर्च प्रयोजनासाठी एकूण रुपये ३००.०० लाख अर्थसंकल्पित असून संदर्भ क्र.१ च्या वित्त विभागाच्या शासन परिपत्रकानुसार प्रथम नऊ माहीसाठी ७०% मर्यादित निधी वितरणाचे आदेश असल्याने ई-गव्हर्नन्स कार्यक्रमांतर्गत संदर्भ क्र. ३ च्या शासन निर्णयान्वये रुपये २१०.०० लाख वितरीत करण्यात आले आहेत. वित्त विभागाच्या दि. २५/०१/२०१९ रोजी निर्गमित करण्यात आलेल्या शासन परिपत्रकान्वये (संदर्भ क्र.४) कार्यक्रम खर्चाच्या बाबीवर ८० टक्के निधी वितरणाची मर्यादा निश्चित करण्यात आली असून त्यानुसार ई-गव्हर्नन्स कार्यक्रम राबविण्यासाठी दुस-या टप्प्यात रु. ३० लाख निधी वितरणासाठी उपलब्ध झालेला आहे. त्यानुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

१. कृषि व पदुम विभाग, मंत्रालयीन कार्यालयांचे संगणकीयदृष्टया बळकटीकरण करण्याच्या दृष्टीने व कृषि आयुक्तालय, पुणे व अधिनस्त विविध काार्यलयांचे संगणकीयदृष्टया बळकटीकरण करण्यासाठी “राज्य ई-गव्हर्नन्स कार्यक्रम” ही राज्य योजना राबविण्यात येत असून सदर कार्यक्रमाच्या अंमलबजावणी करिता दुस-या टप्प्यात रु.३० लाख निधी बाबनिहाय पुढीलप्रमाणे वितरित करण्यात येत आहे :-

(रक्कम रु.लाखात)

| अ. क्र. | स्तर | बाब | मंजुर निधी |
|---|---|---|---|
| अ) | मंत्रालय स्तर (कृषि व पदुम विभाग खुद्द) | मंत्रालय स्तर (कृषि व पदुम विभाग खुद्द) साऊ-सेवार्थ (SAU-SEVARTH) प्रणालीसाठी मनुष्यबळ खर्च भागविणे. | १०.०० |
| ब) | कृषि आयुक्तालय | शासन पत्र क्रमांक आरकेव्ही-०६/७/प्र.क्र. ५१/१४ अे, दिनांक २२/१२/२०१७ नुसार कृषि विभागात ई-गव्हर्नन्स कार्यक्रम राबविणेसाठी नियुक्त अर्न्स्ट ॲन्ड एन.एल.एल.पी मुंबई या सल्लागार कंपनीचे सेवा शुल्क अदा करणे | २०.०० |

**अ) कृषि पदुम विभाग (खुद्द) मंत्रालयीन स्तर**

कृषि विभागाच्या अधिपत्याखाली असलेल्या वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी, डॉ. पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, डॉ. बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे व वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापक प्रशिक्षण संस्था (वनामती), नागपूर व इतर संलग्न कार्यालयासासठी साऊ सेवार्थ प्रणाली तयार करण्यात आली आहे. या प्रणालीबाबतची विकसन व देखभालीची सर्व जबाबदारी सद्य:स्थितीमध्ये MahaIT कडे सोपविण्यात आली आहे. साऊसेवार्थ प्रणालीच्या देखभालीसाठी आवश्यक मनुष्यबळापैकी एक सॉफ्टवेअर डेव्हलपर व एक सिनियर सॉफ्टवेअर डेव्हलपर यांचे परिश्रमिक कृषि विभागास अदा करावयाचे असून इतर कर्मचाऱ्यांच्या सेवा इतर ७ विभांगामध्ये सामाईक असल्यामुळे त्यांच्या परिश्रमिकाचा खर्च ७ विभागांमध्ये विभागला जाणार आहे. त्यानुसार कृषि विभागाच्या साऊसेवार्थ प्रणालीच्या देखभालीसाठी आवश्यक मनुष्यबळाचे दि.१.४.२०१८ ते दि.३१.०३.२०१९ या १ वर्षाचे परिश्रमिक (मानधन) सामान्य प्रशासन विभागाच्या दि.३.४.२०१८ रोजीच्या शासन निर्णयानुसार रु.४६,५५,५०३/- एवढे आहे. सदर परिश्रमिकापैकी रु. १०,००,०००/- (रु. दहा लाख फक्त) MahaIT यांना अदा करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

**ब) कृषि आयुक्तालय स्तर**

कृषि व पदुम विभागात व अधिनस्त कार्यालयामध्ये अद्यावत माहिती तंत्रज्ञानाचा अवलंब करणेसाठी व ई-गव्हर्नन्स कार्यक्रम राबविणेसाठी अर्न्स्ट ॲन्ड यंग.एल.एल.पी, मुंबई या सल्लागार कंपनीची नियुक्ती केली आहे. सदरहू कंपनीमार्फत ई-गव्हर्नन्स प्रकल्पातील बाबींची टप्याटप्याने कामे करुन घेण्यात येणार आहे. सदर कंपनीचे सेवाशुल्क अदा करणे व त्यांचे प्रकल्प अहवालानुसार विविध आज्ञावल्या व माहिती तंत्रज्ञान विषयक सेवा विकसित करणेसाठी येणाऱ्या खर्चाची देयके अदा करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

२. या शासन निर्णयान्वये कृषि विभागांतर्गत ई-गव्हर्नन्स कार्यक्रमाकरिता रु.३० लाख (रुपये तीस लाख फक्त) निधी वितरीत करण्यात आला असून तो पुढील लेखाशिर्षांतर्गत सन २०१८-१९ करिता अर्थसंकल्पीत करण्यात आलेल्या तरतुदीतुन खर्ची टाकावा :-

**"मागणी क्र.डी-७**
**३४५१ सचिवालय- आर्थिक सेवा,**
**पंचवार्षिक योजनांतर्गत योजना**
**(०२) योजना**
**(०२) (०४) ई-गव्हर्नन्स कार्यक्रम अंमलबजावणी**
**(कृषि) (३४५१ २७८२)**
**१७ संगणक खर्च**

३. या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेल्या रु.३० लाख निधीपैकी रु.१० लाख निधी कोषागारातून मंत्रालय स्तरावर आहरण व वितरणासाठी अवर सचिव (आस्थापना), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे व उप सचिव (आस्था), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी म्हणून, आणि उर्वरित रु.२० लाख निधीचे आयुक्त (कृषि) कार्यालयाकरिता कोषागारातून आहरण व वितरणासाठी संचालक आत्मा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी व सहाय्यक संचालक (लेखा-१) यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. मंजूर कार्यक्रमानुसार वितरीत निधीच्या प्रमाणात कार्यक्रम राबवून खर्च करण्यात यावा. सदरचा खर्च हा माहिती व तंत्रज्ञान विभाग व सामान्य प्रशासन विभाग यांनी वेळोवेळी दिलेल्या सूचना व निदेशानुसार करण्यात यावा. तसेच सदर निधीस चालु वर्षी प्रशासकीय मान्यता दिलेल्या प्रयोजनांसाठी कमी-अधिक खर्च होण्याची शक्यता विचारात घेऊन मंजूर प्रयोजनांमध्ये अंतर्गत बाब निहाय बदल आयुक्त (कृषि) यांच्या मान्यतेने करण्यात यावा.

५. सदर ई-गव्हर्नन्स कार्यक्रमांतर्गत उपलब्ध होणाऱ्या निधीचा विनियोग हा उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग व माहिती तंत्रज्ञान संचालनालयाच्या खरेदी/सेवा प्राप्त करण्याकरिता वेळोवेळी विहित केलेल्या अटी/शर्ती व पध्दतीनुसार करण्यात यावा.

६. हा शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि. २५/०१/२०१९ नुसार विहीत केलेल्या अटींची पुर्तता होत असल्याने निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०२२०१२५१३३५७०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यापाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shrikant Chandrakant Andge

Digitally signed by Shrikant Chandrakant Andge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c, serialNumber=d8d9626c9e038380cd235c048f20d7ce74cffd3a95f2ac3c192e9c991f358271, cn=Shrikant Chandrakant Andge
Date: 2019.02.20 12:54:01 +05'30'

**(श्रीकांत आंडगे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे
२) अवर सचिव (आस्थापना), कृषि व पदुम विभाग (खुद्द) मंत्रालय, मुंबई-३२

**प्रत-**

१) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य
२) मा.मंत्री (कृषि व फलोत्पादन), मंत्रालय, मुंबई
३) मा. विरोधी पक्षनेता विधानसभा/ विधान परिषद, विधान भवन, मुंबई
४) मा. राज्यमंत्री (कृषि), मंत्रालय, मुंबई
५) सर्व मा. संसद सदस्य/महाराष्ट्र विधानसभा सदस्य/महाराष्ट्र विधानपरिषद सदस्य
६) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य
७) अपर मुख्य सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई
८) अपर मुख्य सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) संचालक (फलोत्पादन) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१०) संचालक (आत्मा) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
११) सर्व संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१२) महालेखापाल१/२ (लेखा परिक्षा) मुंबई/नागपूर
१३) वरिष्ठ जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१४) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई/अधिदान व लेखा कार्यालय मुंबई
१५) सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष नवीन प्रशासकीय भवन ५ वा मजला, मुंबई
१६) निवडनस्ती (१४-अे कार्यासन) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२